“ई-फेरफार” प्रकल्पांतर्गत “एडीट मोड्यूल” वापरुन हस्तलिखित व संगणकीकृत अधिकार अभिलेख (गा.न.नं.७/१२) तंतोतंत जुळविणे बाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः राभूअ-२०१६/प्र.क्र. १८०/ल-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक: २० डिसेंबर, २०१६

**वाचा :-** १) शासन परिपत्रक क्रमांकः राभूअ/प्र.क्र. १८०/ल-१, दि. ७ मे, २०१६
२) शासन परिपत्रक क्रमांकः राभूअ/प्र.क्र. १८०/ल-१, दि. ३० मे, २०१६
३) शासन परिपत्रक क्रमांकः राभूअ/प्र.क्र. १८०/ल-१, दि. १ जुलै, २०१६
४) शासन परिपत्रक क्रमांकः राभूअ/प्र.क्र. १८०/ल-१, दि. १९ जुलै, २०१६
५) शासन परिपत्रक क्रमांकः राभूअ/प्र.क्र. १८०/ल-१, दि. १ सप्टेंबर, २०१६

## परिपत्रक

ज्या सर्व्हे क्रमांक / गट क्रमांक चा संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ हा हस्तलिखित गा.न.नं. ७/१२ शी तंतोतंत जुळत नाही अशा संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ मध्ये हस्तलिखित गा.न.नं. ७/१२ प्रमाणे दुरूस्ती करण्याच्या दृष्टीने संदर्भिय क्रमांक १ येथील शासन परिपत्रकान्वये राज्यातील तलाठयांना “एडीट मोड्यूल” (Edit Module) उपलब्ध करुन देण्यात आले आहे. सदर परिपत्रकातील कार्यपध्दतीचे व निदेशांचे पालन करुन संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ हा हस्तलिखित गा.न.नं. ७/१२ शी तंतोतंत जुळेल हे दि. ३० जून, २०१६ पर्यंत कोणत्याही परिस्थितीत सुनिश्चित करुन घेण्याचे निदेशही संदर्भिय क्रमांक १ येथील शासन परिपत्रकान्वये शासनाने दिले होते. मात्र विहीत कालावधीत याबाबतची कार्यवाही पूर्ण होऊ शकल्याने “एडीट मोड्यूल” वापरून संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ हा हस्तलिखित गा.न.नं. ७/१२ शी तंतोतंत जुळविण्याची कार्यवाही पूर्ण करण्याकरीता विहीत करण्यात आलेली दि. ३० जून, २०१६ ही मुदत, संदर्भिय क्रमांक ४ व ५ येथील शासन परिपत्रकांन्वये एक विशेष बाब म्हणून दिनांक ३० सप्टेंबर, २०१६ पर्यंत वाढविण्यात आली आहे. मात्र विविध कारणांमुळे अद्यापही याबाबतची अपेक्षित कार्यवाही १०० टक्के पूर्ण होऊ न शकल्याने “एडीट मोड्यूल” चा वापर करण्यासंदर्भात आणखी काही काळ वाढवून मिळण्याची क्षेत्रिय यंत्रणेकडून प्राप्त झालेली विनंती विचारात घेता एक विशेष बाब म्हणून ही मुदत दिनांक ३१ डिसेंबर, २०१६ पर्यंत वाढविण्यात येत आहे.

२. “एडीट मोड्यूल” च्या माध्यमातून संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ मध्ये आवश्यक त्या दुरुस्त्या होईपर्यंत तसेच, ज्या ठिकाणी संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ हा हस्तलिखित गा.न.नं. ७/१२ शी तंतोतंत जुळत असतानांही काही तांत्रिक कारणांस्तव “ई-फेरफार” प्रणालीतून संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ च्या उताऱ्यांचे प्रिंट आऊट काढून अर्जदारांस वितरीत करणे शक्य होत नसेल तेथे शेतकरी खातेदारांना कर्ज व अन्य शेती विषयक प्रयोजनाकरीता गा.न.नं. ७/१२ उतारे सत्वर उपलब्ध करून देण्याची गरज विचारात घेता, फक्त सदर प्रयोजनाकरीता एक विशेष बाब म्हणून दिनांक ३० जून, २०१६ पर्यंत हस्तलिखित अधिकार अभिलेखांवरून गा.न.नं. ७/१२ उतारे देण्याची मुभा संदर्भ क्रमांक १ वरील परिपत्रकान्वये प्रदान करण्यात आली होती व संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ देण्यासंदर्भातील अडचणी विचारात घेवून संदर्भिय क्रमांक २ व ३ येथील परिपत्रकान्वये सदर मुभेचा कालावधी एक विशेष बाब म्हणून दि. ३१ जुलै, २०१६ पर्यंत वाढविण्यात आला होता. मात्र संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ वितरीत करण्यात काही ठिकाणी अद्यापही येत असलेल्या अडचणी विचारात घेता, “एडीट मोड्यूल” च्या माध्यमातून संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ मध्ये आवश्यक त्या दुरुस्त्या होईपर्यंत तसेच, ज्या ठिकाणी संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ हा हस्तलिखित गा.न.नं. ७/१२ शी तंतोतंत जुळत असतानांही काही तांत्रिक कारणांस्तव “ई-फेरफार” प्रणालीतून संगणकीकृत गा.न.नं. ७/१२ च्या उताऱ्यांचे प्रिंट आऊट

काढून अर्जदारांस वितरीत करणे शक्य होत नसेल तेथे, आता एक विशेष बाब म्हणून, केवळ शेतकरी खातेदारांना कर्ज व अन्य शेती विषयक प्रयोजनाकरीता हस्तलिखित गा.न.नं. ७/१२ उतारे वितरीत करण्यास दि. ३१.१२.२०१६ पर्यंत मुभा देण्यात येत आहे.

३. सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२२११०४७१५६३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Ramrao Thorat

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
DN: CN = Vilas Ramrao Thorat, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2016.12.21 10:51:06 +05'30'

**(विलास थोरात)**
**शासनाचे अवर सचिव**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
३) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
४) सर्व जिल्ह्यांचे मा. पालक मंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२
५) मा. राज्यमंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
६) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२
७) प्रधान सचिव (कृषि), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) प्रधान सचिव (माहिती तंत्रज्ञान), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९) प्रधान सचिव, ग्रामविकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१०) सर्व विभागीय आयुक्त
११) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख (महाराष्ट्र राज्य), पुणे
१२) आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे
१३) नोंदणी महानिरीक्षक व मुद्रांक नियंत्रक, महाराष्ट्र राज्य, पुणे
१४) सर्व जिल्हाधिकारी (मुंबई शहर वगळून)
१५) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र १, मुंबई
१६) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा) महाराष्ट्र २, नागपूर
१७) प्रधान सचिव (महसूल) यांचे विशेष कार्य अधिकारी मंत्रालय मुंबई-३२.
१८) सर्व सहसचिव व सर्व उपसचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय मुंबई-३२.
१९) राज्य सूचना विज्ञान अधिकारी, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, मुंबई
२०) उप महा निदेशक, राष्ट्रीय सूचना विज्ञान केंद्र, पुणे
२१) माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीकरीता)
२२) कार्यासन ल-१, निवड नस्ती.